स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत वैयक्तिक घरगुती व सामुदायिक/सार्वजनिक शौचालय बांधकामाकरीता केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांक: स्वमअ-२०१९/प्र.क्र.११२(१)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९ ऑक्टोंबर, २०१९

**वाचा:**

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दि. १५.०५.२०१५
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वमअ-२०१५/प्र.क्र.४०/नवि-३४, दि. १४.०८.२०१५
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९
५) केंद्र शासनाच्या, गृहनिर्माण व नागरीकार्य मंत्रालयाचे आदेश क्रमांक १/७/२०१५-SBM PART-१ दि. १३.०९.२०१९.
६) शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०१९/प्र.क्र.११२(१)/नवि-३४, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९.

**शासन निर्णय:**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वैयक्तिक घरगुती व सामुदायिक/सार्वजनिक शौचालय बांधकामाकरीता केंद्र व राज्य शासनाच्या हिश्यातील निधीचा वितरीत करण्याबाबतचा संदर्भाधिन क्रमांक ६ येथील दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

२. देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि स्वच्छ पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" राबविण्यात येत आहे.

३. केंद्र शासनाने स्वच्छ भारत अभियाना अंतर्गत वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामाकरीता व सामुदायिक/सार्वजनिक शौचालय बांधकामाकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षात राज्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ५ येथील आदेशान्वये रुपये ३३,४०,००,०००/- (रूपये तेहतीस कोटी चाळीस लक्ष फक्त) एवढा निधी वितरीत केला आहे.

४. त्यानुसार, स्वच्छ भारत अभियानांतर्गत वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामाकरीता सामुदायिक/ सार्वजनिक शौचालय बांधकामाकरीता केंद्र शासनाचा वितरीत केलेला रुपये ३३,४०,००,०००/- (रूपये तेहतीस कोटी चाळीस लक्ष फक्त) व त्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा रूपये ५०,६५,३७,०००/- (रूपये पन्नास कोटी पासष्ठ लक्ष सदोतीस हजार फक्त) असा केद्र व राज्य हिश्याचा मिळून एकूण रूपये ८४,०५,३६,०००/- (रूपये चौऱ्याऐंशी कोटी पाच लक्ष छत्तीस हजार फक्त ) इतका निधी राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे. सदरचा खर्च पुढील तक्त्यात नमूद

केल्यानुसार संबंधित लेखाशिर्षासमोर दर्शविल्याप्रमाणे संबंधित लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत करण्यात आलेली निधी रूपये |
|---|---|---|
| अ) | महानगरपालि**का** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७५२) योजनांतर्गत | ८,००,००,०००/- (रूपये आठ कोटी फक्त.) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७७) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७६१) योजनांतर्गत | १२,००,००,०००/- (रूपये बारा कोटी फक्त.) |
| ब) | **नगरपरीषद** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७८) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपरिषदांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७७९) योजनांतर्गत | २२,३२,००,०००/- (रूपये बावीस कोटी बत्तीस लक्ष फक्त.) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७९) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपरिषदांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७८८) योजनांतर्गत | ३३,९३,३६,०००/- (रूपये तेहतीस कोटी त्र्यान्नव लक्ष छत्तीस हजार फक्त.) |
| क) | **नगरपंचायत** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९३, नगरपंचायतींना सहाय्य, (००) (०३) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपंचायतींना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७९७) योजनांतर्गत | ३,०८,००,०००/- (रूपये तीन कोटी आठ लक्ष फक्त.) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९३, नगरपंचायतींना सहाय्य, (००) (०४) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपंचायतींना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९८०३) योजनांतर्गत | ४,७२,००,०००/- (रूपये चार कोटी बहात्तर लक्ष फक्त.) |

५. सदर निधी आहरित करण्यासाठी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करून ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा. सदर निधीचे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय वाटप शासन स्वतंत्र आदेशान्वये करून देईल, त्यानुसार या निधीचे वितरण संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना करण्याची कार्यवाही राज्य अभियान संचालकांनी करावी.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १.४.२०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८.७.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८.७.२०१९ मधील परिच्छेद क्र. ४ ते १९ मधील अनुक्रमांक ४, ५, ६, ८, १०, ११, १२, १४, १५, १६, १८, १९ अटी लागू नाहीत व उर्वरित ७, ९ , १३ व १७ या अटींची पुर्तता करण्यात आली असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

८. वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.७.२०१९ रोजीच्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टामधील अनुक्रमांक ९ मधील तपासणी सूचिमधील १ ते ५ व ७ आणि ९ या अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे, तसेच उर्वरित अटी लागू नाहीत.

९. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९ नुसार केंद्र पुरस्कृत योजने संदर्भात केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करुन घेण्यात आली आली आहे. त्यानुसार सदर शासन निर्णयान्वये एकूण रुपये रूपये ८४,०५,३६,०००/- (रूपये चौऱ्याऐंशी कोटी पाच लक्ष छत्तीस हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

१०. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ-३३२/अर्थोपाय, दि. १६/९/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१०१९१८३८४६८४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2019.10.19 18:40:44 +05'30'

**(अजित पालवे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.

८. आयुक्त, महानगरपालिका (संबंधित)
९. मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायती (संबंधित)
१०. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
१३. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१५. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१७. निवडनस्ती, नवि-३४